**महाराष्ट्र पशुसंवर्धन सेवा (गट-अ) अंतर्गत सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन संवर्गात जाहिरात क्र. ०१६/२०२२ अन्वये सरळसेवा नियुक्त उमेदवारांस पदस्थापना देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन आदेश क्र. DAHD-११/१/२०२४-DAHD-AH१(७२०३६१),**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०५/०३/२०२४

**वाचा:-**
१. शासन निर्णय साप्रवि क्र. चारित्र्य-२११७/प्र.क्र.४८३/२०१७ /१६-अ, दि. २८/०८/२०१७
२. साप्रवि अधिसूचना क्र. एसआरव्ही-२०२०/ प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४/०७/२०२१
३. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र .एडीआर-३४२१/ सीआर ७३/ २०२१/अठ्ठावीस, दि.०४/०१/२०२४
४. आयुक्त पशुसंवर्धन यांचे पत्र क्र. राजप-१/प्र. क्र. ११७/सरळसेवा भरती-ACAH- ५६/१२४, पस-२, पुणे, दि. ३१/०१/२०२४
५. आयुक्त पशुसंवर्धन यांचे पत्र क्र. राजप-१/प्र. क्र. ११७/सरळसेवा भरती-ACAH- ५६/१८२/ २४, पस-२, पुणे, दि. १६/०२/२०२४
६. मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई यांचे मूळ अर्ज क्र. २५/२०२४ अंतर्गत दि. १६/०२/२०२४ रोजी पारीत अंतरिम आदेश.

**प्रस्तावना :-**

सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र पशुसंवर्धन सेवा (गट-अ) जाहिरात क्र. ०१६/२०२२ प्रकरणी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून संदर्भाधीन क्र. ३ येथील दि. ०४.०१.२०२४ रोजीच्या पत्रान्वये ५६ पदांपैकी ५३ पदांची सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन पदाकरिता प्रवर्गनिहाय गुणवत्तेच्या आधारे शासनाकडे शिफारस केलेली आहे. सदर ५३ शिफारसपात्र उमेदवारांची नियुक्तीपूर्वी कागदपत्र पडताळणी प्रक्रिया पूर्ण करण्यात येऊन त्यांना संदर्भाधिन क्र. २ येथील अधिसूचना दि. १४ जुलै, २०२१ अन्वये महसूली विभाग वाटप करण्यात आला.

सदर भरती प्रक्रियेच्या अनुषंगाने मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल मुळ अर्ज क्र. २५/२०२४ प्रकरणी मा. न्यायाधिकरणाने संदर्भ क्र. ६ येथील दि. १६/०२/२०२४ रोजी पारित अंतरिम आदेशान्वये प्रतिवादी क्र. ४ डॉ. अजित कवडेकर या उमेदवाराची नियुक्ती राखून ठेवण्यात येत आहे.

पशुसंवर्धन विभागात सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन संवर्गात मोठ्या प्रमाणात रिक्त पदे असल्याने सदर रिक्त पदे तातडीने भरण्याच्या दृष्टीने शिफारसपात्र उमेदवारांचे वैद्यकीय अहवाल व पोलीस तपासणी अहवाल प्राप्त होण्याच्या अधिन राहून महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने केलेल्या शिफारशीच्या अनुषंगाने संबंधित उमेदवारांना सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन या पदावर तात्पुरती नियुक्ती देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या ५२ उमेदवारांची पशुसंवर्धन विभागात **सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र पशुसंवर्धन सेवा (गट-अ)** (एस:२२ रु. ६००००-१९०८००/-) या पदावर महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण अटी व शर्ती) नियम, १९८१ मधील नियम ९(४३) मध्ये विहित केलेल्या परिविक्षाधीन या संज्ञेच्या व्याख्येनुसार सोबतच्या **"परिशिष्ठ-अ"** येथे दर्शविण्यात आल्यानुसार **स्तंभ ६** येथील महसूली विभाग वाटप करण्यात आला असून, सदर महसूली विभागांतर्गत **स्तंभ ७** येथील पदावर तात्पुरती नियुक्ती करण्यात येत आहे.

सोबतच्या **"परिशिष्ठ-अ"** येथे नमुद केलेल्या उमेदवारांची नियुक्ती खालीलप्रमाणे नमुद अटी व शर्तींच्या अधिन राहून केवळ तात्पुरत्या स्वरुपात करण्यात येत आहे-

१). सदर उमेदवारांना सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि. २२ जुन, २०२१ मधील नविन परिवीक्षाधीन धोरण लागू राहील. यानुसार उमेदवारांचा परिवीक्षाधीन कालावधी ०२ वर्षाचा राहील. सदर कालावधीत संबंधित उमेदवार परिविक्षा धोरणानुसार शासकीय कामकाज करण्यास सक्षम नसल्याचे सिध्द झाल्यास त्याची शासकीय सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल.

२). सदर उमेदवारांनी दि. १८/०३/२०२४ रोजी संबंधित नियुक्ती जिल्ह्याचे जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त कार्यालयात रूजू होणे आवश्यक आहे. शासन सेवेत रुजू झाल्यानंतर संबंधित अधिकारी यांनी आपले नियुक्तीच्या पदावर हजर व्हावे. सदर उमेदवारांणा शासन सेवेत हजर होन्याकामी केलेल्या प्रवासाचा खर्च अनुज्ञेय राहणार नाही.

३). विभागाद्वारे निर्गमित राज्य प्रशिक्षण धोरणास अनुसरुन विभागाच्या कामकाजाविषयी आयोजित प्रशिक्षणाकरीता सर्व उमेदवारांनी उपस्थित राहणे बंधनकारक राहिल. सदर प्रशिक्षणासंबंधी उमेदवारांना आयुक्त पशुसंवर्धन यांचेमार्फत स्वतंत्रपणे कळविण्यात येईल.

४). सदर उमेदवारांची जेष्ठता महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ मधील तरतुदीनुसार राहील. विहित कालावधीत पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होणाऱ्या उमेदवारांची जेष्ठता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून निर्धारित गुणवत्ता यादीमधील गुणवत्ता क्रमांकानुसार राहिल. तसेच सदर जेष्ठता नियमावलीमध्ये वेळोवेळी करण्यात येणाऱ्या सुधारणा सदर उमेदवारांना लागू राहतील.

५). सदर उमेदवारांच्या मागील ५ वर्षातील वास्तव्य कालावधी संदर्भातील चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणी अहवाल प्राप्त होण्याच्या अधिन राहून सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. चारित्र्य-२११७/प्र.क्र.४८३/२०१७/१६-अ, दि.२८/०८/२०१७ मधील तरतुदीच्या अनुषंगाने तात्पुरती पदस्थापना करण्यात येत आहे. सदर नियुक्ती उमेदवारांनी साक्षांकन नमुन्यामध्ये सादर केलेल्या माहितीच्या आधारे करण्यात येत असून सदर माहिती असत्य असल्याचे आढळून आल्यास कोणतीही पूर्वसूचना न देता संबंधितांचे तात्पुरते नियुक्तीपत्र रद्दबादल करुन भारतीय दंडसंहितेनुसार फौजदारी कारवाई तसेच शासन सेवेत कायमस्वरुपी अपात्र ठरविण्यात येईल.

६). महिलांच्या आरक्षित पदावर शिफारस करण्यात आलेल्या महिला उमेदवारांचे तसेच अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती व्यतिरिक्त इतर सर्व मागास प्रवर्गातील उमेदवारांचे उन्नत व प्रगत गटात (क्रीमिलेयर) मोडत नसल्याचे सक्षम प्राधिकारीऱ्यांनी दिलेल्या NCL (Non Creamy Layer) प्रमाणपत्राची वैधता सक्षम प्राधिकरणाकडून तपासून घेण्याच्या अधीन राहून करण्यात येते आहे. उमेदवारांचे NCL प्रमाणपत्र अवैध आढळून आल्यास संबंधित उमेदवारांची तात्पुरती नियुक्ती कोणतीही पूर्व सूचना न देता रद्द करण्यात येईल.

७). आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांकरिता आरक्षित पदावर शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांचे आर्थिकदृष्ट्या दुर्बल प्रमाणपत्र सक्षम प्राधिकरणाकडून तपासून घेण्याच्या अधीन राहून संबंधित

उमेदवारांची नियुक्ती करण्यात येत आहे. उमेदवारांद्वारे सादर केलेले प्रमाणपत्र अवैध आढळून आल्यास संबंधित उमेदवारांची तात्पुरती नियुक्ती कोणतीही पूर्व सूचना न देता रद्द करण्यात येईल.

८). राखिव पदांकरिता शिफारसप्राप्त मागासवर्गीय प्रवर्गातील उमेदवारांबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र: बीसीसी-२०११/प्र.क्र.१०६४/२०११/१६-ब, दि. १२/१२/२०११ मधील तरतूदीनुसार जात वैधता प्रमाणपत्राची वैधता तपासण्याच्या अधिन राहून तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात येत आहे. सदरहू उमेदवाराकडे जात पडताळणी समितीकडून प्राप्त करुन घेतलेले जाती वैधता प्रमाणपत्र असल्यास त्याने नियुक्तीसाठी हजर होताना ते सादर करावे. नसल्यास त्याने जाती प्रमाणपत्र पडताळणीसाठी आवश्यक असलेली सर्व कागदपत्रे/प्रमाणपत्रे तात्काळ उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. जात वैधता प्रमाणपत्र अवैध आढळून आल्यास साप्रवि, शासन परिपत्रक क्र: बीसीसी-२०१२/प्र.क्र.३३२/१२/१६-ब, दि. १८/०५/२०१३ मधील नमूद सूचनांनुसार कार्यवाही करण्यात येईल याची नोंद घेण्यात यावी.

९). दिव्यांगांसाठी राखीव असलेल्या पदावर शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांची दिव्यांग प्रमाणपत्रांची वैधता वैद्यकीय मंडळाकडून तपासून घेण्याच्या अधीन राहून त्यांची नियुक्ती करण्यात येत आहे. सदर प्रमाणपत्र अवैध आढळून आल्यास प्रचलित नियमांनुसार कार्यवाही करण्यात येईल.

१०). सदर उमेदवारांनी संबंधित वैद्यकीय मंडळांकडून वैद्यकीय तपासणी अहवाल महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील नियम ११(१) अन्वये नियुक्ती होण्यापूर्वी किंवा नियुक्तीच्या तारखेपासून त्याची सहा महिन्याची सेवा पूर्ण होण्यापूर्वी, यापैकी जे अगोदर घडेल त्याप्रमाणे वैद्यकीय प्रमाणपत्र दाखल करणे बंधनकारक राहील, या अटीस अधीन राहून तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे. सहा महिन्यांच्या आत वैद्यकीय तपासणी अहवाल प्राप्त न झाल्यास सदर उमेदवारांची नियुक्ती कोणतीही पूर्व सूचना न देता रद्द करण्यात येईल. तसेच, वैद्यकीय तपासणी अहवाल असमाधानकारक असल्यास त्यांची नियुक्ती कोणतेही कारण न देता १ (एक) महिन्याची पूर्व नोटीस देऊन समाप्त करण्यात येईल.

११). सदर उमेदवारांनी सहायक आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र पशुसंवर्धन सेवा ह्या पदाच्या सेवा प्रवेश नियमानुसार विभागामार्फत आयोजित केल्या जाणाऱ्या विभागीय लेखा परीक्षा, प्रादेशिक भाषा परीक्षा, तसेच संगणक परीक्षा विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे अनिवार्य राहील. तसेच विभागांतर्गत वेळोवेळी विहित नियमानुसार आयोजित करण्यात येणाऱ्या इतर परीक्षा परिवीक्षाधीन कालावधीच्या ०२ वर्षाच्या विहित मुदतीत उत्तीर्ण होणे अनिवार्य राहील. सदर उमेदवार विहित मुदतीत ह्या परीक्षा उत्तीर्ण होणार नाहीत त्यांची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल.

१२). परिविक्षाधीन अधिकाऱ्याने कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास किंवा विहित विभागीय लेखा परीक्षा परिविक्षा कालावधीत उत्तीर्ण न केल्यास अथवा त्याची वर्तणुक अयोग्य, संशयास्पद आढळल्यास तो /ती कोणतीही पूर्वसूचना न देता सेवेतून कमी करण्यास पात्र ठरेल.

१३). उपरोक्त उमेदवार त्यांच्या सेवेचा राजीनामा देऊ इच्छित असेल त्यांनी शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-१०९२/१०३३/प्र.क्र.३३/९२/८, दि. ०२/१२/१९९७ मधील तरतूदीनुसार शासनाला किमान ०१ (एक) महिन्याची आगाऊ नोटीस देणे आवश्यक राहील. शासनास या उमेदवारांची सेवा समाप्त करावयाची असेल त्यावेळी अशी एक महिन्याची आगाऊ नोटीस दिली जाईल. मात्र गैरशिस्त, सेवानियमाचा भंग इ. कारणासाठी सेवा समाप्त करतांना वरील उमेदवारांला नोटीस देण्याचे शासनास बंधन राहणार नाही. हे नोटीशीचे नियम या नंतर वेळोवेळी होणाऱ्या नियमांतील बदलाच्या अधिन राहतील.

१४).सदर उमेदवारांना शासन निर्णय वित्त विभाग, क्र.अनियो-१००५/१२६/सेवा-४, दि. ३१/१०/२००५ मधील तरतूदीनुसार नविन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू राहील. तसेच सदर उमेदवारांना शासनाद्वारे वेळोवेळी होणाऱ्या सुधारणा लागू राहतील.

१५).सदर उमेदवारांना साप्रवि, शासन अधिसूचना, एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि. १४ जुलै, २०२१ अन्वये महसूल विभाग वाटप नियमावली, २०२१ लागू राहील. सदर अधिसूचनेमधील तरतुदींनुसार उमेदवारांना सरळसेवेने नियुक्तीनुसार महसूली विभाग वाटप करण्यात आलेले आहे. सदर अधिसूचनेतील तरतुदीनुसार गट-अ संवर्गात नियुक्त झालेल्या उमेदवारांना वाटप झालेल्या विभागीय संवर्गात किमान ३ वर्ष इतका कालावधी पूर्ण करणे आवश्यक राहील.

१६).सहायक आयुक्त पशुसंवर्धन, गट-अ या संवर्गात शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांपैकी जे उमेदवार शासन सेवेत आहेत अशा उमेदवारांचे गोपनीय अभिलेख नियुक्ती पूर्वी तपासण्याबाबत आयोगाने दिलेल्या सूचनेच्या अनुषंगाने शासन सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवारांनी त्यांचे गोपनिय अहवाल १ महिन्याच्या आत आयुक्त, पशुसंवर्धन यांचेकडे जमा करावे. सदर गोपनीय अहवालाच्या तपासणीच्या अधिन राहून सदर उमेदवारांना नियुक्ती देण्यात येत आहे.

१७). पशुसंवर्धन विभागामधील सहायक आयुक्त पशुसंवर्धन संवर्गासाठी निश्चित केलेल्या सेवा शर्ती सदर उमेदवारांना लागू राहतील.

१८). वरीलपैकी उमेदवार सेवेत हजर होतील त्यांचेबाबतचा अहवाल आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे-७ यांनी शासनास तात्काळ सादर करावा.

सदरचे नियुक्ती आदेश सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन (गट-अ) संवर्गामध्ये जाहिरात क्र. १६/२०२२ मधील सरळसेवेने नियुक्ती बाबत मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल मुळ अर्ज क्र. २५/२०२४ तसेच सदर भरती प्रक्रियेच्या अनुषंगाने मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण व मा. उच्च न्यायालय वा अन्य कोणत्याही न्यायालयात दाखल असलेल्या कोणत्याही विवक्षीत न्यायालयीन प्रकरणाच्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२४०३०५१७५३२६४५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

NIWRUTTI BHAGUJI MARALE

Digitally signed by NIWRUTTI BHAGUJI MARALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74bb051c4c3c90a9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80796592830D345500F15CC, cn=NIWRUTTI BHAGUJI MARALE
Date: 2024.03.05 18:02:58 +05'30'

**(नि.भा. मराळे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा. मंत्री (पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव,
४. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव
५. मा. अ.मु.स, सामान्य प्रशासन विभाग (सेवा) यांचे स्वीय सहाय्यक
६. मा. अ.मु.स, वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक
७. मा. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्रासह)

८. आयुक्त पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. (०५ प्रती)
९. कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्यविज्ञान विद्यापीठ, नागपूर
१०. अतिरिक्त आयुक्त, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ नागपूर
११. सहआयुक्त पशुसंवर्धन (मुख्यालय), पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे.
१२. सर्व प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त
१३. सहआयुक्त पशुसंवर्धन, पशुजैव पदार्थ निर्मिती संस्था, औध,पुणे.
१४. सहआयुक्त पशुसंवर्धन, रोग अन्वेषण विभाग, पुणे.
१५. निबंधक, महाराष्ट्र पशुवैद्यक परिषद,नागपूर
१६. संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१७. संबंधित जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त
१८. महालेखापाल/महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा)मुंबई/ नागपूर
१९. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
२०. संबंधित अधिकारी.....(आयुक्त पशुसंवर्धन यांचेमार्फत)
२१. निवड नस्ती (पदुम-१).

**शासन आदेश क्र.DAHD-११/१/२०२४-DAHD-AH१(७२०३६१), दि.०५/०३/२०२४ सोबतचे "परिशिष्ठ-अ"**

| अ.क्र. | गुणवत्ता यादी क्र. | उमेदवारांचे नांव | मूळ प्रवर्ग | शिफारस प्रवर्ग | महसूल विभाग वाटप | पदस्थापनेचे पद/ठिकाण |
|---|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) |
| १ | १ | डॉ.महेश अंबादास शेजाळ | खुला | खुला | पुणे | तालपसचि कागल, जि. कोल्हापूर |
| २ | २ | डॉ.सचिन सदाशिव खेमलापुरे | खुला | खुला | पुणे | तालपसचि इंदापूर, जि. पुणे |
| ३ | ३ | डॉ.सोमनाथ विठ्ठल गावडे | भज-क | खुला | पुणे | तालपसचि वडूज, जि. सातारा |
| ४ | ४ | डॉ.अभिजित महादेव इंगळे | खुला | खुला | छ. संभाजीनगर | तालपसचि अंबड, जि. जालना |
| ५ | ५ | डॉ.नितीन सुधाकर मगर | खुला | खुला | पुणे | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त कार्यालय, सातारा |
| ६ | ७ | डॉ दत्तात्रय किसन इंगोले | खुला | खुला | छ. संभाजीनगर | जि.प.स.चि., बीड |
| ७ | ८ | डॉ. नितीन नानासाहेब पवार | इमाव | खुला | पुणे | तालपसचि शिरुर, जि. पुणे |
| ८ | ९ | डॉ.अजय काशिनाथराव मुस्तरे | खुला | खुला | छ. संभाजीनगर | तालपसचि वसमत, जि. हिंगोली |
| ९ | १० | डॉ.सादगीरे माधव अंगदराव | खुला | खुला | पुणे | पशुवैद्यकीय जैवपदार्थ निर्मिती संस्था, पुणे |
| १० | ११ | डॉ. शिवकुमार तुकाराम खारगे | विमाप्र | खुला | पुणे | प्रक्षेत्र व्यवस्थापक, शासकीय पशुपैदास प्रक्षेत्र, जुनोनी, ता. सांगोला, जि. सोलापूर |
| ११ | १२ | डॉ.औदुंबर अंकुश गावडे | खुला | खुला | पुणे | तालपसचि अकलूज, जि. सोलापूर |
| १२ | १३ | डॉ.शामराव रामा कोळेकर | खुला | खुला | पुणे | तालपसचि शाहुवाडी, जि. कोल्हापूर |
| १३ | १४ | डॉ.येवले विशाल दादाभाऊ | खुला | खुला | पुणे | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त कार्यालय, सोलापूर |
| १४ | १५ | डॉ.चव्हाण शरद रत्नकांत | खुला | खुला | कोकण | तालपसचि पेण, जि. रायगड |

| शासन आदेश क्र.DAHD-११/१/२०२४-DAHD-AH१(७२०३६१), दि.०५/०३/२०२४ सोबतचे "परिशिष्ठ-अ" | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | गुणवत्ता यादी क्र. | उमेदवारांचे नांव | मूळ प्रवर्ग | शिफारस प्रवर्ग | महसूल विभाग वाटप | पदस्थापनेचे पद/ठिकाण |
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) |
| १५ | १६ | डॉ.गौतम सुदाम खिल्लारे | अ.जाती | खुला | छ. संभाजीनगर | तालपसचि नायगांव, जि. नांदेड |
| १६ | १७ | डॉ. कौठाळे राहुल रामदास | इमाव | खुला | नाशिक | तालपसचि निफाड, जि. नाशिक |
| १७ | १८ | डॉ. मुंढे उपेंद्र त्रिंबकराव | भज-ड | खुला | छ. संभाजीनगर | तालपसचि आष्टी, जि. बीड |
| १८ | १९ | डॉ कृष्णदेव अंकुश खाडे | अ.जाती | खुला | छ. संभाजीनगर | विभागीय व्यवस्थापक, शासकीय गोठीत रेतमात्रा निर्मिती केंद्र, छ. संभाजीनगर |
| १९ | २० | डॉ. रोहित विजय धुमाळ | खुला | खुला ऐवजी खेळाडू | छ. संभाजीनगर | तालपसचि धर्माबाद, जि. नांदेड |
| २० | २१ | डॉ दिनेश मन्नुसिंग महेर. | विजा (अ) | विजा (अ) | छ. संभाजीनगर | तालपसचि कंधार, जि. नांदेड |
| २१ | २२ | डॉ. प्रतिक अशोक बोडखे | इमाव | इमाव | अमरावती | तालपसचि दर्यापूर, जि. अमरावती |
| २२ | २३ | डॉ.गोल्हेर दुर्गेश मुरहारी | अ.जाती | अ.जाती | छ. संभाजीनगर | तालपसचि बदनापूर, जि. जालना. |
| २३ | २४ | डॉ.अवधुत विजय देवकर | इमाव | इमाव | छ. संभाजीनगर | तालपसचि गंगाखेड, जि. परभणी |
| २४ | २५ | डॉ.शितल लक्ष्मण नवले | इमाव | इमाव | पुणे | तालपसचि बारामती, जि. पुणे |
| २५ | २६ | डॉ. शुभांगणी भाऊराव केवट | भज (ब) | खुला महिला | कोकण | तालपसचि महाड, जि. रायगड |
| २६ | २७ | डॉ.रोहित कृष्णा रानभरे | विमाप्र | विमाप्र | कोकण | तालपसचि रत्नागिरी, जि. रत्नागिरी |
| २७ | २८ | डॉ. कांबळे पुजा किशोर | अ.जाती | खुला-महिला | कोकण | तालपसचि दापोली, जि. रत्नागिरी |
| २८ | २९ | डॉ. अश्विनी भालचंद्र कांबळे | अ.जाती | खुला-महिला | नागपूर | तालपसचि कळमेश्वर, जि. नागपूर |
| २९ | ३० | डॉ. युवराज दिनकर शेटे | अ.जाती | अ.जाती | कोकण | तालपसचि, देवरुख, जि. रत्नागिरी |

| शासन आदेश क्र.DAHD-११/१/२०२४-DAHD-AH१(७२०३६१), दि.०५/०३/२०२४ सोबतचे "परिशिष्ठ-अ" | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | गुणवत्ता यादी क्र. | उमेदवारांचे नांव | मूळ प्रवर्ग | शिफारस प्रवर्ग | महसूल विभाग वाटप | पदस्थापनेचे पद/ठिकाण |
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) |
| ३० | ३१ | डॉ.शरद गोविंद अस्वले | अ.जमाती | अ.जमाती | कोकण | तालपसचि सावंतवाडी, जि. सिंधुदुर्ग |
| ३१ | ३२ | डॉ. अजय बाळू कांबळे | अ.जाती | अ.जाती | कोकण | जि.प.स.चि, रायगड |
| ३२ | ३३ | डॉ.सुनिता श्रीपती चौगुले | आदुघ | खुला-महिला | पुणे | तालपसचि तासगांव, जि. सांगली |
| ३३ | ३४ | डॉ.सतिश वाल्मीक तांबे | आदुघ | आदुघ | नागपूर | तालपसचि नागभिड, जि. चंद्रपूर |
| ३४ | ३५ | डॉ. जितेश शिशुपाल कुमरे | अ.जमाती | अ.जमाती | नागपूर | प्रक्षेत्र व्यवस्थापक, शासकीय पशुपैदास प्रक्षेत्र, वडसा, जि. गडचिरोली. |
| ३५ | ३६ | डॉ. दीपक पोतारेड्डी मादिकुंटावार | भज (ब) | भज (ब) | नागपूर | तालपसचि वडसा, जि. गडचिरोली |
| ३६ | ३७ | डॉ. गजनान दिगंबर तोटेवाड | अ.जमाती | अ.जमाती | अमरावती | तालपसचि मलकापूर, जि. बुलढाणा |
| ३७ | ३८ | डॉ.शुभा विनोदराव देशमुख | इमाव | खुला-महिला | नाशिक | तालपसचि साक्री, जि. धुळे |
| ३८ | ३९ | डॉ. संजीवनी प्रकाश वाघमारे | अ.जाती | खुला-महिला | नागपूर | तालपसचि देवरी, जि. गोंदिया |
| ३९ | ४० | डॉ. अतुल शंकर पाटणे | आदुघ | आदुघ | नाशिक | तालपसचि अकोले, जि. अहमदनगर |
| ४० | ४१ | डॉ. शितल पांडुरंग पवार | आदुघ | आदुघ | नाशिक | तालपसचि चाळीसगांव, जि. जळगांव |
| ४१ | ४२ | डॉ.प्रिया गंगाधर धुतराज | अ.जाती | खुला-महिला | छ. संभाजीनगर | तालपसचि पुर्णा, जि. परभणी |
| ४२ | ४३ | डॉ. पाटील मेघा पिंताबर, | इमाव | इमाव | नाशिक | तालपसचि येवला, जि. नाशिक |
| ४३ | ४४ | डॉ.अंजली मारोतराव सोनफुले | अ.जाती | अ.जाती | अमरावती | तालपसचि खामगांव, जि. बुलढाणा |
| ४४ | ४५ | डॉ. अस्मिता उत्तमराव रणवीर | अ.जाती | अ.जाती | अमरावती | तालपसचि शेगांव, जि. बुलढाणा |
| ४५ | ४६ | डॉ. समिर युसुफ काझी | आदुघ | आदुघ | नाशिक | तालपसचि नवापूर, जि. नंदुरबार |

| शासन आदेश क्र.DAHD-११/१/२०२४-DAHD-AH१(७२०३६१), दि.०५/०३/२०२४ सोबतचे "परिशिष्ठ-अ" | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **गुणवत्ता यादी क्र.** | **उमेदवारांचे नांव** | **मूळ प्रवर्ग** | **शिफारस प्रवर्ग** | **महसूल विभाग वाटप** | **पदस्थापनेचे पद/ठिकाण** |
| **(१)** | **(२)** | **(३)** | **(४)** | **(५)** | **(६)** | **(७)** |
| ४६ | ४७ | डॉ.अहिरे सुनिल जगन्नाथ | अ.जमाती | अ.जमाती | अमरावती | तालपसचि रिसोड, जि. वाशिम |
| ४७ | ४८ | डॉ.शितल सिताराम ताराम | अ.जमाती | अ.जमाती-महिला | नागपूर | तालपसचि धानोरा, जि. गडचिरोली |
| ४८ | ४९ | डॉ.सायली सुरेश तगारे | आदुघ | आदुघ-महिला | अमरावती | तालपसचि पांढरकवडा, जि. यवतमाळ |
| ४९ | ५० | डॉ.शेखर वसंतराव बागल (दिव्यांग) | खुला | दिव्यांग-(कर्णबधीर) | पुणे | तालपसचि कोरेगांव, जि. सातारा |
| ५० | ५१ | डॉ. अश्विनी बळीराम गडमडे (चौधरी) | अ.जमाती | अ.जमाती-महिला | नागपूर | तालपसचि लाखांदूर, जि. भंडारा |
| ५१ | ५२ | डॉ.विद्या सुर्यकांत कदम (विद्या मोरे) | आदुघ | आदुघ-महिला | अमरावती | तालपसचि उमरखेड, जि. यवतमाळ. |
| ५२ | ५३ | डॉ.संदीप नामदेव दवंडे (दिव्यांग) | अ.जाती | दिव्यांग-(अल्पदृष्टी) | नागपूर | तालपसचि तिरोडा, जि. गोंदिया |

*****************